201107051611340001

**मुद्रांक शुल्कासोबत अतिरिक्त १ टक्का मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणा-या रकमेचे सन-२०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधीत महानगरपालिकेस वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.स्थासंक-२०११/प्र.क्र.७०/नवि-३४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक: ३० मे, २०११**

***संदर्भ :-***
१) शासन अधिसुचना क्र.०२०९/प्र.क्र.८०/०९/नवि-३४ दिनांक १ जानेवारी, २०१०.
२) शासन अधिसुचना क्र.स्थासक ०२१०/प्र.क्र.३४/नवि-३४ दिनांक ३१ मार्च, २०१०.
३) शासन अधिसुचना क्र.मुद्राशु-२०११/प्र.क्र.२७/११/नवि-३४ दिनांक १८ फेब्रुवारी, २०११.
४) शासन निर्णय क्रमांक स्थासंक-२०१०/प्र.क्र.९१/२०१०/नवि-३४, दिनांक १८ मार्च,२०११.
५) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.वानियो.२०११/प्र.क्र.५५/नवि-४ दिनांक २६ मे,२०११.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. २ च्या अधिसूचनेद्वारे राज्यास शासनाने मिरा-भाईंदर, जळगांव, नांदेड-वाघाळा या तीन महानगरपालिका क्षेत्रात दिनांक १/४/२०१० पासून तसेच कोल्हापूर, सोलापूर व वसई-विरार या ३ महानगरपालिका क्षेत्रात दि.१/०४/२०११ पासुन जकाती ऐवजी स्थानिक संस्था कर लागू करण्यात आलेला आहे. जकाती ऐवजी स्थानिक संस्था कर लावलेल्या महानगरपालिका क्षेत्रामध्ये स्थावर मालमत्तेच्या विवक्षित हस्तांतरणावरील मुद्रांक शुल्का सोबत १ टक्का अधिभार लावण्याचा निर्णय राज्य शासनाने संदर्भ क्रमांक १ व ३ च्या अधिसूचनेद्वारे घोषित केला आहे. त्यानुषंगाने मिरा-भाईंदर, जळगांव, नांदेड-वाघाळा या महानगरपालिकांत दि. ०१/०४/२०१० पासून व कोल्हापूर, सोलापूर व वसई-विरार महानगरपालिकांच्या कार्यक्षेत्रात दि. ०१/०४/२०११ पासून स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण या वरील संलेखावर बसवावयाच्या मुद्रांक शुल्कात १ टक्का दराने अधिभार आकारुन वाढ करण्यात आली असून ती नियमितपणे शासनाकडे जमा करण्यात येत आहे.

०२. मुद्रांक शुल्काच्या सोबत जमा करण्यात येत असलेल्या सदर १ टक्का अधिभारामुळे शासनाकडे जमा झालेली रक्कम संबंधित महानगरपालिकांना सहायक अनुदान म्हणून वितरित करण्याच्या दृष्टीने शासनाच्या वर्ष २०११-१२ च्या अर्थसंकल्पात रु.८०.०० कोटी मात्रची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद संबंधित महानगरपालिकांसाठी सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षात या शासन निर्णयाद्वारे खालील प्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

**(रुपये कोटीत)**

| अ. क्र | | महानगरपालिका | वितरीत करावयाचा निधी. |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | मिरा-माईंदर | ३०.०० |
| २ | | वसई विरार | १२.०० |
| ३ | जळगांव | जळगांव | ४.०० |
| ४ | नोंदड | नांदेड-वाघाळा | ४.०० |
| ५ | कोल्हापूर | कोल्हापूर म.न.पा. | ५.०० |
| ६ | सोलापूर | सोलापूर म.न.पा. | ५.०० |
| | | **एकूण** | **६०.००** |

०३. सदर अनुदान वरोल्लोखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हायाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर अनुदान कोषागारातून आहरण करुन संबंधित महानगरपालिकांना अविलंब वितरीत करण्याची व्यवस्था करावी वितरण करतांना संदर्भ क्र. ४च्या शासन निर्णयाने विहीत केलेली कार्यपद्धती वापरावी.

या करीता होणारा खर्च "मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रक्कमा देणे.२००, इतर संकिर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रक्कमा (००) (०९) स्थानिक संस्थांनी जकातीचे पुनःस्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रातील मुद्रांक शुल्कावर १% अधिभार देण्याच्या दृष्टीने बदली महानगरपालिकांसाठी तरतुद (३६०४९२४)३१ सहायक अनुदान (वेतनेतर)"

या लेखा शिर्षाखाली घालून तो सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागवण्यात यावा.

०४. सदर १ टक्का अधिभारपोटी जमा रक्कमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणा-या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिका-यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व या बाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व कागदपत्रे महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई व महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर यांना आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

हा शासन निर्णय वित्त विभागाने प्रशासकीय विभागाना संदर्भ क्र.५ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सुचना नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ दिपक म्हैसेकर ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संबधित जिल्हाधिकारी, (ठाणे, जळगांव, नोंदड ,कोल्हापूर व सोलापूर)
२. आयुक्त संबधित महानगरपालिका
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५. मुख्यलेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. महानिरीक्षक, नोंदणी व मुद्राक शुल्क पुणे
८. वित्तविभाग व्यय-३/अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई
९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई
१०. मा.राज्यमंत्री (नगर विकास ) यांचे खाजगी सचिव
११. कार्यासन अधिकारी (नवि-४), नगर विकास विभाग
१२. निवडनस्ती, नवि-३४